स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत नागरी घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

सांगली मिरज कुपवाड महानगरपालिका, जिल्हा सांगली.

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:-स्वमअ-२०२०/प्र.क्र.४१/नवि-३४**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ३ मार्च, २०२०

**वाचा:-**

१.शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: स्वभाअ-२०१५/प्र. क्र. २३/नवि-३४, दि. १५ मे, २०१५

२.स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत गठीत उच्चाधिकार समितीच्या दिनांक ३०.८.२०१९ रोजी पार पडलेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

देशातील सर्व शहरांमधील नागरिकांना स्वच्छ पर्यावरण व चांगले आरोग्य मिळावे, या करिता केंद्र शासनामार्फत “स्वच्छ भारत अभियान (नागरी)” संपूर्ण देशामध्ये राबविण्यात येत आहे. केंद्र शासनाच्या “स्वच्छ भारत अभियान (नागरी)” च्या धर्तीवर संदर्भीय क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये राज्यामध्ये “स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)” ची अंमलबजावणी सुरू आहे. या अभियांनांतर्गत शहरे “हागणदारी मुक्त” करणे व घनकचरा व्यवस्थापनांतर्गत “स्वच्छ” करणे या दोन प्रमुख घटकांचा समावेश आहे.

२. या अनुषंगाने शहरातील घनकचरा व्यवस्थापनासाठी सांगली मिरज कुपवाड महानगरपालिकेने घनकचरा व्यवस्थापनाच्या सविस्तर प्रकल्प अहवालास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाकडे सादर केला होता. राज्य अभियान संचालनालय, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) स्तरावर या प्रस्तावाची छाननी करून हा प्रस्ताव दिनांक ३०.०८.२०१९ रोजी संपन्न झालेल्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीत सादर केला होता.

३. त्यानुसार, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत गठीत मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या बैठकीत सांगली मिरज कुपवाड महानगर पालिकेच्या नागरी घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पास मान्यता देण्यात आली आहे. या घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पाचे सविस्तर प्रकल्प अहवालास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने तांत्रिक मान्यता (Technical Sanction) दिली आहे. त्यामुळे, सांगली मिरज कुपवाड महानगर पालिकेच्या रु. ६०.०५ कोटी किंमतीच्या नागरी घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत सांगली मिरज कुपवाड महानगरपालिकेच्या या शासन निर्णया सोबतच्या विवरणपत्रात नमूद एकूण रुपये ६०.०५ कोटी किंमतीच्या नागरी घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पास पुढील परिच्छेद ४ मध्ये नमूद अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन प्रशासकीय मंजूरी देत आहे.

२. सांगली मिरज कुपवाड महानगरपालिकेचा नागरी घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पाचा मंजूर वित्तीय आकृतीबंध पुढीलप्रमाणे राहील:

**(रुपये कोटीत)**

| प्रकल्पाची मंजूर किंमत (डीपीआर नुसार) | केंद्र शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (अनुज्ञेय प्रकल्प किंमतीच्या ३५%) | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (अनुज्ञेय प्रकल्प किंमतीच्या २३.३३%) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (केंद्र व राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदाना व्यतिरिक्त) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| ६०.०५ | २१.०१ | १४.०० | २५.०४ (राष्ट्रीय हरित लवादाच्या निर्णयानुसार इस्क्रो खात्यामध्ये जमा करण्यात आलेल्या रकमेतून) |

३. **निधी वितरणाची कार्यपध्दती** :

३.१ केंद्र शासन पुरस्कृत स्वच्छ भारत अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार केंद्र व राज्य शासनाचा अनुज्ञेय हिश्याचा निधी हा दोन टप्यात (५० टक्के + ५० टक्के) वितरीत केला जाईल.

३.२ सदर प्रकल्पासाठी निधी वितरीत करताना दिलेल्या सूचनांनुसार, सदर प्रकल्पासाठी प्राप्त निधी शासनाच्या प्रचलित धोरणानुसार विहीत केलेल्या बँकांमध्ये, स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील.

३.३ सदर प्रकल्पासाठी वितरीत केलेला निधी त्याच प्रकल्पासाठी वापरणे बंधनकारक असून त्याचा वापर इतर प्रयोजनार्थ केल्यास सदर बाब ही गंभीर वित्तिय अनियमितता समजण्यात येईल.

३.४ राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्था/कार्यान्वयन यंत्रणेची राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध करून दिले जाणार नाही.

३.५ स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत मंजूर घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पासाठी केंद्र व राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदाना व्यतिरिक्त उर्वरित निधी (उपरोक्त तक्त्यातील रकाना ४ नुसार) संबंधित नागरी स्थानिक स्वराज संस्थेने उभारून केंद्र व राज्य हिश्याच्या प्रमाणात खर्च करणे आवश्यक राहील.

३.६ स्वच्छ महाराष्ट्र अभियानाच्या वित्तिय आकृतीबंधानुसार केंद्र व राज्य शासनाने वितरीत केलेल्या निधीच्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज संस्थेने स्व:हिश्याचा निधी उभारून, सदर एकत्रित खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनाने विहित केलेल्या प्रपत्रात सादर करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज संस्थेवर बंधनकारक असणार आहे.

३.७ सदर प्रकल्पासाठी उपलब्ध करून दिलेल्या केंद्र व राज्य शासनाच्या हिश्श्याच्या प्रथम हप्त्याच्या निधीचे विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र राज्य शासनास सादर केल्यानंतर दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

४. **अटी व शर्ती :**

४.१ सदर प्रकल्पासाठी कार्यान्वयीन यंत्रणा सांगली मिरज कुपवाड महानगर पालिका राहील.

४.२ केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना व राज्य शासनाच्या संदर्भाधीन क्रमांक १ चा शासन निर्णय व घनकचरा व्यवस्थापन नियम, २०१६ नुसार सदर प्रकल्पाची अंमलबजावणी विहित कालावधीमध्ये करणे कार्यान्वयीन यंत्रणेस बंधनकारक राहील.

४.३ घनकचरा व्यवस्थापन नियम २०१६, अन्वये विहित केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पांचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यात आलेले आहेत. या प्रकल्प अहवालाची यशस्वीता ही घनकचऱ्याचे निर्मितीच्या जागीच विलगीकरण करण्यावर आधारित आहे. त्यामुळे शहरात निर्माण होणाऱ्या १००% घनकचऱ्याचे निर्मीतीच्या जागीच विलगीकरण करून, तो कचरा वेगवेगळा संकलीत करणे अत्यावश्यक राहील.

त्यानुसार, सांगली मिरज कुपवाड महानगर पालिकेने मे, २०२० पर्यंत शहरात दररोज निर्माण होणाऱ्या घनकचऱ्यापैकी किमान ९०% घनकचऱा निर्मितीच्या जागीच विलगीकरण करून संकलीत करणे बंधनकारक राहील.

४.४ या विलगीकरण केलेल्या ओल्या कचऱ्यावर केंद्रित अथवा विकेंद्रित पध्दतीने प्रक्रीया सुरू करणे बंधनकारक राहील.

४.५ या विलगीकरण केलेल्या कचऱ्याची वाहतूक व त्यावर करावयाची शास्त्रोक्त प्रक्रीया या बाबीची सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये समाविष्ठ बाबींची विहित कालावधीमध्ये अंमलबजावणी करण्याची जबाबदारी कार्यान्वयीन यंत्रणेची राहील.

४.६ घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालात नमूद उपकरणे/मशीन/यंत्रे इत्यादी ची खरेदी Government eMarketplace (GeM) पोर्टल वरूनच करणे बंधनकारक राहील. याशिवाय इतर पद्धतीचा अवलंब करून खरेदी केल्यास, ती आर्थिक अनियमितता समजून शासनामार्फत पुढील उचित कार्यवाही करण्यात येईल.

४.७ सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करताना पुढील १० वर्षांची आवश्यकता विचारात घेवून तयार केलेला आहे. या प्रकल्प अहवालाची अंमलबजावणी सुरू करताना सध्याची आवश्यकता विचारात घेवूनच आवश्यक खरेदी व बांधकामे करण्यात यावीत.

४.८ प्रकल्पाचे काम सुरु झाल्यानंतर सक्षम प्राधिकाऱ्याने कामाची गुणवत्ता व देयके प्रमाणित केल्यानंतर उपलब्ध निधीच्या मर्यादेत कामाची देयके १५ दिवसांत संबंधित कंत्राटदारास देण्याची जबाबदारी संबंधित स्थानिक स्वराज्य संस्था/कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

४.९ घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पाच्या देखभाल दुरुस्ती खर्चासाठी आवश्यक ती यंत्रणा संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेने विकसित करावी व त्याद्वारे सदर प्रकल्पासाठीचा देखभाल व दुरुस्तीचा खर्च भागविण्यात यावा.

५. स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत सांगली मिरज कुपवाड महानगर पालिकेच्या घनकचरा व्यवस्थापनासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात येत असलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालाची अंमलबजावणी

करताना पुढील प्रमाणे निश्चित केलेले उद्दिष्ट पूर्ण करणे (Outcome base) कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.:-

- शहरात निर्माण होणाऱ्या घनकचऱ्याचे निर्मितीच्या जागी १००% विलगीकरण (at Source Segregation) करणे.
- विलगीकरण केलेल्या १००% कचऱ्याची विलगीकृत पध्दतीने वाहतूक करणे.
- ओल्या कचऱ्यापासून कंपोस्ट खत निर्मिती करणे अथवा त्यावर बायोमिथेनायझेशन पध्दतीने प्रकिया करणे.
- खत निर्मिती करण्यात येत असेल तर, ओल्या कचऱ्यापासून निर्माण केलेल्या सेंद्रिय खताची FCO मानकानुसार राज्य शासनाने प्राधिकृत केलेल्या प्रयोगशाळेमधून तपासणी करून घेवून त्यास "हरित महासिटी कंपोस्ट" हा ब्रँड मिळविणे. तसेच या सेंद्रिय खताची "हरित महासिटी कंपोस्ट" या नावाने विक्री करणे.
- सुक्या कचऱ्याचे पदार्थ पुनर्प्राप्ती सुविधा केंद्रावर (Material Recovery Facility) दुय्यम विलगीकरण (Secondary Segregation) करावे. यापैकी पुनर्वापर होऊ शकणाऱ्या सुक्या कचऱ्याचा पुनर्वापर करावा अथवा शक्य असल्यास त्याची विक्री करावी.
- उपरोक्त सर्व प्रक्रीयानंतर शिल्लक राहणाऱ्या उर्वरित कचऱ्याची भराव भूमीवर विल्हेवाट लावणे बंधनकारक राहील.
- शहरातील डंपीग साईटवर साठविलेल्या जुन्या कचऱ्यावर प्रक्रिया केल्यानंतर ९०% जमीन पुनर्प्राप्त करणे आवश्यक राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३०३१०५४३८७४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ajit Sahebrao Palwe

Digitally signed by Ajit Sahebrao Palwe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bcc5dbdaa52955626b8257f1105a8a62ddbd1337948a428b4e4c992e5d3bf423, cn=Ajit Sahebrao Palwe
Date: 2020.03.03 10:57:38 +05'30'

**(अजित पालवे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री, नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री, नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव
४. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक
५. प्रधान सचिव,नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक
६. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

८. आयुक्त तथा संचालक, महानगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.

९. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान संचालनालय, मुंबई.

१०. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.

११. जिल्हाधिकारी, सांगली.

१२. जिल्हा प्रशासन अधिकारी, सांगली.

१३. आयुक्त, सांगली मिरज कुपवाड महानगर पालिका.

१४. निवडनस्ती, नवि-३४.

(शासन निर्णय क्रमांक:-स्वमअ-२०२०/प्र.क्र.४१/ नवि-३४ दिनांक: ३.०३.२०२० सोबतचे विवरणपत्र)

| Sr No. | Description of Sub-Work | Amount in Rs. |
|---|---|---|
| **1** | **Capital Expenditure on Procurement of vehicles for collection and transportation** | |
| i | 4-wheelers AutoTippers for MSW collection (48 Nos) | 2,92,80,000 |
| ii | Dumper Placer (3 Nos.) | 60,15,000 |
| iii | Garbage Tipper Truck (4 Nos.) | 52,40,000 |
| iv | Refuse Compactors (5 Nos.) | 2,04,40,000 |
| v | Wheel Tractor Dozer (3 Nos.) | 55,50,000 |
| | **Sub-Total** | **6,65,25,000** |
| **2** | **Capital Expenditure on Design, Procurement and construction of Processing Facilities** | |
| i | Design, Construction and procurement of plant and machinery for Material Recovery Facility like Shredders, separators, conveyors, etc including Civil industrial shed | 15,94,06,348 |
| | A) At Sangli on Samdoli dumping site for 35 TPD (Rs 4,57,34,326) | |
| | B) At Miraj on Bedag dumping site for 80 TPD (Rs 6,98,96,508) | |
| | C) At Kupwad on for 33 TPD (Rs 4,37,75,514) | |
| ii | Design and Construction of Civil industrial shed along with procurement of Compost Processing facility with Windrow, screening, and associated infrastructure (192 TPD) | 21,14,24,942 |
| iii | Design, Procurement and construction of Bio-Methanation plant of 5 TPD each at two MRF facilities at Sangli – Samdoli and Miraj – Bedag | 3,00,00,000 |
| | **Sub-Total** | **40,08,31,290** |
| **3** | Capital Expenditure on Disposal of Solid waste in Sangli Miraj Kupwad city | |
| | (a) Bioremediation (Biomining) of legacy waste | 9,03,14,731 |
| | (b) Construction of Sanitary Landfill (SLF) at Bedag Dumpsite | 3,28,28,979 |
| | **Sub-Total** | **12,31,43,710** |
| **4** | Capital Expenditure on Information, Education and Communication (IEC) | 1,00,00,000 |
| | **TOTAL** | **60,05,00,000** |